**ताब्यात घेतलेल्या खाजगी वनाचे सर्वेक्षण व सिमांकन या योजनेचा सन २०१४-१५ करिता चालू बाब प्रस्ताव.. (४४०६-००७१).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१४/प्र.क्र.२०५/फ-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १२ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/ चाबाप्र/प्र.क्र.३९/(१४-१५)/३९८. दिनांक ९ जून, २०१४.
२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २०.०९.२०१४.
३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३१.०१.२०१५.
४) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि. १.७.२०१४.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पुरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३,दि. १.१.२०१५
६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. २.१.२०१५.
७) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.९.२.२०१५.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र खाजगी वने (संपादन) अधिनियम, १९७५ अंतर्गत संपादित क्षेत्राचे सर्वेक्षण व सिमांकन करणे आवश्यक आहे. त्यासाठी सन २०१४-१५ मध्ये एकूण २१३.७६ कि.मी. लांबीच्या सर्वेक्षण व सिमांकन कामासाठी रु. २६.७५ लक्ष रकमेची आवश्यकता आहे.

सन २०१४-१५ करिता याबाबत ताब्यात घेतलेल्या खाजगी वनाचे सर्वेक्षण व सिमांकन या संदर्भात उपशिर्ष (४४०६ ००७१) योजनांतर्गत रु. २६.७५ लक्ष रकमेचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

**शासन निर्णय :**

सन २०१४-१५ करिता वार्षिक योजनेतील राज्ययोजने अंतर्गत "ताब्यात घेतलेल्या खाजगी वनांचे सर्व्हेक्षण व सिमांकन" यासंदर्भात उपशिर्ष (४४०६-००७१) या योजने साठी रु.२६.७५ लक्ष (१०० %) नियतव्यय अर्थ संकल्पित करण्यात आलेला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भांकित क्र.७ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०१४-१५ चा उर्वरीत कालावधी, वितरीत निधी व त्याचा झालेला विनियोग पाहाता योजनांतर्गत ७५ % एवढया मर्यादेत निधी वितरीत करण्यास विभागास मान्यता देण्यात आली आहे.

उपरोक्त शासन परिपत्रकान्वये प्रकरणी नियतव्यय अर्थ संकल्पित रु. २६.७५ लक्ष निधी पैकी ७५ % निधी रु. २०,०६,२५०/- इतका होतो. त्यापैकी शासन निर्णय दिनांक २०.९.२०१४ अन्वये रु.११.२३ लक्ष तसेच शासन निर्णय दिनांक ३१.१.२०१५ अन्वये रु. ४.८२ लक्ष असा एकूण रु. १६.०५,०००/- (६०%) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तेव्हा उर्वरीत १५% निधी म्हणजे **रु. ३.११,२५०/- (०२ मजूरी रु. ६२,२५०/- व २७ लहान बांधकामे रु.२.४९ लक्ष) निधी** वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, राज्य योजनांतर्गत योजना, ताब्यात घेतलेल्या खाजगी वनांचे सर्वेक्षण व सिमांकन (४४०६-

००७१) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१४-१५ मध्ये मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र७०/२००८/विनियम, दिनांक १५/५/२००९ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०२१२१७१०३५८२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.02.12 17:19:56 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), धुळे.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महा. राज्य, मुंबई / नागपूर.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी, ब-१, जागतीक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.